राष्ट्रीय रुरबन मिशन अंतर्गत गावसमुह
आराखडा निश्चित झाल्याने जिल्हास्तरावर
विविध समित्या स्थापन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एनआरएम-२०१६/प्र.क्र.१७८/योजना-४

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०३ डिसेंबर, २०१६

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः एनआरएम-२०१६/प्र.क्र.०१/योजना-४,दिनांक १४ जानेवारी, २०१६**

प्रस्तावना

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय रुरबन मिशन अंतर्गत देशातील ग्रामीण भागातील गावांच्या समुहांचा आर्थिक, सामाजिक, भौतिक विकास करणे आणि शहाराप्रमाणे पायाभूत सुविधा पुरविण्यात येणार आहेत. यामध्ये कृषी व कृषीशी संलग्न असणाऱ्या क्षेत्रांना विशेष प्राधान्य देण्यात येणार आहे.

उपरोक्त शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या गावसमुहांच्या विकासासाठी जिल्हास्तरावर समिती करण्याच्या संक्षिप्त सूचना देण्यात आलेल्या आहेत. परंतू या योजनेचे स्वरुप लक्षात घेता जिल्हा स्तरावर विविध समित्या गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय रुरबन मिशन अंतर्गत प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा स्तरावर खालीलप्रमाणे विस्तृत समित्या गठीत करण्यात येत आहेत.

२. या विभागाच्या शासन निर्णय दिनांक १४ जानेवारी, २०१६ अन्वये जिल्हा स्तरावर जिल्हास्तरीय समितीचे गठण करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. त्या अनुषंगाने, गावसमुह विकसित करताना, जिल्हा स्तरावर खालीलप्रमाणे तीन प्रकारच्या समित्या गठित करणे आवश्यक आहेत. सदर समित्या खालीलप्रमाणे आहेत.

**(अ) शिखर समिती :-**

राष्ट्रीय रुरबन मिशन अंतर्गत गावसमुहांच्या विकासाच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या मंजूर आरखडयाप्रमाणे कार्यवाहीचे दिशादिगदर्शन, सनियंत्रण व अंमलबजावणी यंत्रणामध्ये समन्वय ठेवण्यासाठी जिल्हा पातळीवर संबंधित जिल्हयाच्या पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली शिखर समिती गठीत करण्यात येत आहे. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असेल:-

| | | |
|---|---|---|
| १. | संबंधित जिल्ह्याचे पालकमंत्री | अध्यक्ष |
| २. | संबंधित रुरबन गावसमुहाचे अंतर्भूत असणाऱ्या मतदार संघाचे खासदार | सदस्य |
| ३. | संबंधित रुरबन गावसमुहाचे अंतर्भूत असणाऱ्या मतदार संघाचे आमदार | सदस्य |
| ४. | जिल्हाधिकारी | सदस्य |
| ५. | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य |
| ६. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य सचिव |

सदर समिती ही राष्ट्रीय रुरबन मिशन अंतर्गत जिल्हा स्तरावर उच्चतम समिती म्हणून कार्यरत राहील. उपरोक्त समिती सदस्य व्यतिरिक्त, आवश्यकता वाटल्यास गरजेप्रमाणे जिल्ह्यातील इतर अधिकाऱ्यांना या समितीवर निमंत्रक म्हणून घेण्याचे अथवा समितीच्या बैठकांना उपस्थित राहण्यासंबंधी निर्देश देण्याचे अधिकार संबंधित पालकमंत्री यांना असतील. सदर समिती केंद्र शासनाच्या रुरबन मिशन अंतर्गत निवडण्यात आलेल्या गावसमुहाच्या विकासाच्या दृष्टीने जिल्हयातील सर्व यंत्रणामध्ये समन्वय साधन्याचे व सनियंत्रणाचे काम करेल. तसेच सदर समितीची बैठक ही सहा महिन्यातून किमान एकदा होणे आवश्यक राहील. गरजेप्रमाणे अधिक बैठका घेणे आवश्यक असल्यास, सदर बैठका घेण्यास संबंधित पालकमंत्री हे निर्देश देतील.

**(ब) नियामक समिती :-**

सदर समिती ही जिल्हास्तरावरील मुख्य समिती असून, गावसमुहाच्या विकासाबाबतचे नियोजन व त्या अनुषंगाने आवश्यक असणारे निर्णय केंद्र शासनाकडून वेळोवळी देण्यात येणाऱ्या मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून घेईल. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असेल :-

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी | सहअध्यक्ष |
| ३. | जिल्हा नियोजन अधिकारी | सदस्य |
| ४. | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | सदस्य |
| ५. | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य |
| ६. | जिल्हा नगर रचनाकार | सदस्य |

| | |
|---|---|
| ७. कार्यकारी अभियंता (सार्वजनिक बांधकाम विभाग) | सदस्य |
| ८. कार्यकारी अभियंता (महाराष्ट्र जिवन प्राधिकरण) | सदस्य |
| ९. कार्यकारी अभियंता (लघु पाट बंधारे विभाग) | सदस्य |
| १०. कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा ) | सदस्य |
| ११.उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) | सदस्य |
| १२.जिल्हा समाज कल्याण अधिकारी | सदस्य |
| १३.शिक्षणाधिकारी (प्राथमिक) | सदस्य |
| १४.शिक्षणाधिकारी (माध्यमिक) | सदस्य |
| १५.जिल्हा परिवहन अधिकारी | सदस्य |
| १६.जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य |
| १७.जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |
| १८.गट विकास अधिकारी (गावसमुहाचा तालुका) | सदस्य |
| १९.संबंधित गाव समुहातील सर्वात जास्त लोकसंख्या असलेल्या गावाचा सरपंच | सदस्य |
| २०.प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य सचिव |

उपरोक्त समिती सदस्या व्यतिरिक्त, आवश्यकता वाटल्यास गरजेप्रमाणे जिल्ह्यातील इतर अधिकाऱ्यांना या समितीवर निमंत्रक म्हणून घेण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना असतील. सदर समिती केंद्र शासनाच्या रुरबन मिशन अंतर्गत निवडण्यात आलेल्या गावसमुहाच्या विकासाच्या दृष्टीने महत्वाचे प्रशासकीय निर्णय घेण्याचे काम करील व कामांवर सनियंत्रण करेल. तसेच सदर समितीची बैठक ही दोन महिन्यातून किमान एकदा होणे आवश्यक राहील. (दोन बैठकांमधील अंतर दोन महिन्यापेक्षा अधिक असणार नाही. ) गरजेप्रमाणे अधिक बैठका घेणे आवश्यक असल्यास, सदर बैठका घेण्यास जिल्हाधिकारी सक्षम राहतील.

**(क) कार्यकारी समिती :-**

सदर समिती ही नियामक समितीने वेळोवळी घेतलेल्या निर्णयांच्या अंमलबजावणीचे काम करेल. तसेच विकास समुहाच्या कामांवर सनियंत्रण करेल. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असेल :-

| | |
|---|---|
| १. मुख्य कार्यकारी अधिकारी | अध्यक्ष |
| २. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) | सदस्य |
| ३. समाज कल्याण अधिकारी (जिल्हा परिषद) | सदस्य |

४. शिक्षणाधिकारी (प्राथमिक) सदस्य
५. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) सदस्य
६. जिल्हा कृषी अधिकारी (जिल्हा परिषद) सदस्य
७. जिल्हा आरोग्य अधिकारी सदस्य
८. कार्यकारी अभियंता (बांधकाम, पाणीपुरवठा, लघुपाटबंधारे) सदस्य
९. गट विकास अधिकारी (गावसमुहाचा तालुका) सदस्य
१०. सहायक गट विकास अधिकारी ( गावसमुहाचा तालुका) सदस्य
११.प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा सदस्य सचिव

कार्यकारी समिती ही प्रशासकीय समितीच्या अधिपत्याखाली काम करेल. प्रशासकीय समितीने घेतलेल्या निर्णयांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याचे काम कार्यकारी समिती करेल. कार्यकारी समितीच्या अध्यक्षांना आवश्यकता वाटल्यास गरजेप्रमाणे जिल्ह्यातील इतर अधिकाऱ्यांना या समितीवर निमंत्रक म्हणून घेण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी यांना असतील. सदर समितीची बैठक महिन्यातून किमान एक वेळा घेणे आवश्यक राहील. (दोन बैठकांमधील अंतर एक महिन्यापेक्षा अधिक असणार नाही.) गरजेप्रमाणे अधिक बैठका घेणे आवश्यक असल्यास, सदर बैठका घेण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी सक्षम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३१५२७२९३७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Mahadev Gengaje

Digitally signed by Rajendra Mahadev Gengaje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aadac6f62a04dc76f59a0a873d1263c7d14f6ea5080bb750bf392303a1a35907, cn=Rajendra Mahadev Gengaje
Date: 2016.12.03 17:00:55 +05'30'

**(रा. म. गेंगजे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,

३. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा. विधानसभा/मा. विधानपरिषद सदस्य (सर्व)
६. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव
७. मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व),
८. मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त/ नियोजन)
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०. जिल्हाधिकारी (सर्व)
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१२. सहसचिव/ उपसचिव, ग्राम विकास विभाग (सर्व)
१३. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
१४. निवडनस्ती